डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जयंती निमित्ताने
राज्यामध्ये "भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर
सामाजिक समता सप्ताह" साजरा करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- बीसीएच-२०१५/प्र.क्र.४०/बांधकामे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १ एप्रिल, २०१५

**प्रस्तावना :-**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी भारतीय राज्यघटनेद्वारे देशाला समता, स्वातंत्र्य व बंधूत्व या त्रयीने समाजामध्ये एकात्मता निर्माण करण्याचा प्रयत्न केलेला आहे. राज्यघटनेच्या कलम ४६ मध्ये घटनेने समाजातील दुर्बल वंचितांबाबत राज्याची जबाबदारी अत्यंत दूरदर्शीपणाने व गांर्भीयाने नमूद केलेली आहे. कलम ४६ मध्ये "... **राज्य हे दुर्बलतर जनवर्ग आणि विशेषत: अनुसूचित जाती व अनुसूचित जनजाती यांचे विशेष काळजीपूर्वक शैक्षणिक व आर्थिक हितसंवर्धन करील आणि सामाजिक अन्याय व सर्व प्रकारचे शोषण यापासून त्यांचे संरक्षण करील..."** असे नमूद करण्यात आले आहे. वरील निर्देशांचे अनुषंगाने अनूसूचित जाती व सर्व प्रकारचे पीडीत शोषीत असलेल्यांना न्याय व आर्थिक, सामाजिक संरक्षण उपलब्ध करुन देण्याचा राज्य सरकार सातत्याने प्रयत्न करीत आहे. त्या अनुषंगाने कल्याणकारी योजना राज्यभर राबविण्यात येत आहेत.

सामाजिक न्याय विभागाच्या विविध योजना या राज्यघटनेतील कलम ४६ मधील निर्देशाचे पालन करुनच तयार करण्यात आलेल्या आहेत. अनुसूचित जाती, वंचित दुर्बल घटकांच्या सर्वांगीण विकासाचे ध्येय म्हणून या योजना राबविण्यात येत आहेत. या सर्व योजनांची माहिती सर्वसामान्य जनतेला व्हावी. तसेच वर उल्लेख केल्याप्रमाणे उद्देश साध्य व्हावे या करिता डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जयंती निमित्ताने राज्यात "भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर सामाजिक समता सप्ताह" साजरा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यामध्ये "भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर सामाजिक समता सप्ताह" दिनांक ८ एप्रिल,२०१५ ते १४ एप्रिल,२०१५ या कालावधीत साजरा करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. या कार्यक्रमाचे आयोजन खाली नमूद केल्याप्रमाणे करण्यात यावे:-

| दिनांक | **कार्यक्रम** |
|---|---|
| ८ एप्रिल, २०१५ | समता सप्ताहाचे राज्यभर एकाच वेळी उदघाटन करावयाचे आहे. सर्व जिल्हा मुख्यालयाच्या ठिकाणी जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, यांनी उदघाटनाचा कार्यक्रम आयोजित करावा. याबाबतची सर्व जबाबदारी सहाय्यक आयुक्त यांनी पार पाडावी. जिल्हयातील सामाजिक न्याय विभागांतर्गत कार्यरत असलेल्या सर्व महामंडळाचे जिल्हा व्यवस्थापक व जिल्हयाचे माहिती अधिकारी यांना सदर कार्यक्रमामध्ये प्रामुख्याने सामावून घ्यावे. तसेच जिल्हयातील सर्व शासकीय अधिकारी, सामाजिक संघटनेचे प्रतिनिधी, जिल्हयातील सर्व लोकप्रतिनिधी यांना निमंत्रित करावे. सकाळी १०.०० वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या प्रतिमेस पुष्पहार अर्पण करुन सप्ताह आयोजनाचे उद्देश विषद करावे.त्याचप्रमाणे पुणे येथे व विभागीय स्तरावर ठीकठीकाणी सदर कार्यक्रमाचे आयोजन करावे. |

| | |
|---|---|
| | मुख्य कार्यक्रमाचे उदघाटन मा. मंत्री (सामाजिक न्याय), मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे प्रमुख उपस्थितीत मुंबई येथे करण्याबाबतच्या सर्व कार्यक्रमाचे नियोजन प्रादेशिक उपायुक्त, मुंबई यांनी करावे. |
| ९ एप्रिल, २०१५ | सामाजिक न्याय विभागाअंतर्गत सर्व महामंडळामार्फत राबविण्यात येणा-या विविध योजनेअंतर्गत कर्जाचे लाभार्थ्यांना वाटप करावे. कर्ज वाटप कार्यक्रमाचा खर्च संबंधीत महामंडळांनी त्यांच्या आर्थिक तरतूदीमधून करावा. |
| १० एप्रिल,२०१५ | जिल्हामाहिती अधिकारी यांच्या समन्वयाने जिल्हयातील सर्व माध्यमांचे प्रतिनिधी दृकश्राव्य, प्रिंट मिडीया, प्रसार माध्यमे, यांचे करीता एका दिवसाची कार्यशाळा आयोजित करावी. या कार्यशाळेत जिल्हयास्तरावरील सर्व शासकीय अधिका-यांना निमंत्रित करुन शासनाच्या सर्व कल्याणकारी योजना जनतेपर्यंत प्रभावीपणे पोहचविण्याकरीता उदबोधन करावे. त्याचप्रमाणे पुणे येथे व विभागीय स्तरावर ठीकठीकाणी सदर कार्यक्रमाचे आयोजन करावे. |
| ११ एप्रिल, २०१५ | जिल्हयाचे आरोग्य अधिकारी व सिव्हील सर्जन यांचे सहकार्याने रक्तदान शिबिराचे आयोजन करावे. व्यसनमुक्ती प्रसार कार्यात कार्यरत विविध संस्था संघटनेच्या सहाय्याने कार्यक्रम करावेत. त्याचप्रमाणे पुणे येथे व विभागीय स्तरावर ठीकठीकाणी सदर कार्यक्रमाचे आयोजन करावे. |
| १२ एप्रिल,२०१५ | सर्व शासकीय कार्यालय, स्वयंसेवी संस्थेच्या सहाय्याने, जिल्हयांच्या सर्व महत्वाच्या ठिकाणी व अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्त्यामधून स्वच्छता अभियान राबवावे. त्याचप्रमाणे पुणे येथे व विभागीय स्तरावर ठीकठीकाणी सदर कार्यक्रमाचे आयोजन करावे. |
| १३ एप्रिल, २०१५ | प्रत्येक जिल्हयांतील सहाय्यक आयुक्त यांनी जिल्हयातील सामाजिक कार्यक्षेत्रातील विचारवंत, नामवंत पत्रकार तसेच सामाजिक चळवळीतील प्रसिध्द व्यक्ती यांचे समाज प्रबोधनपर विविध विषयावर व्याख्यानाचे आयोजन करावे. तसेच अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांतील नामवंत लोककलावंत यांचे विविध सामाजिक विषयावर प्रबोधनपर कार्यक्रमाचे आयोजन करावे. त्याचप्रमाणे पुणे येथे व विभागीय स्तरावर ठीकठीकाणी सदर कार्यक्रमाचे आयोजन करावे. |
| १४ एप्रिल, २०१५ | जिल्हास्तरावरील सर्व कार्यालयामध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या प्रतिमेस अभिवादन करावे व जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली प्रमुख कार्यक्रमाचे आयोजन करुन "भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर सामाजिक समता सप्ताह" याची सांगता करावी. या समारोप कार्यक्रमाचे मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे हस्ते पुणे येथे करण्याचे प्रादेशिक उपायुक्त, पुणे यांनी नियोजन करावे. |

या कार्यक्रमाच्या जाहिरातीबाबतची संपूर्ण कार्यवाही महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी), पुणे या संस्थेने पार पाडावी.

२. या कार्यक्रमासाठी वर्तमानपत्रातील, दृकश्राव्य माध्यमे व रेडिओवरील जाहिरातीसाठीचा खर्च रु. ९२.०० लाख (रुपये ब्याण्णव लाख फक्त) डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी), पुणे या संस्थेने करावा व उर्वरित खर्च रु.९०.०० लाख (रुपये नव्वद लाख फक्त) एवढा निधी आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्या सूचनेनुसार डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी), पुणे या संस्थेने सर्व जिल्ह्याचे सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांना उपलब्ध करुन द्यावा.

३. सदर कार्यक्रमासाठी येणाऱ्या खर्चाकरीता महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी), पुणे व आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०४१५३४४५३३२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: CN = Dinesh Ramchandra Dingle, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.04.04 15:44:54 +05'30'

**( दि.रा. डिंगळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन, मलबार हिल, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
सर्व मा. मंत्री/ मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
आयुक्त, समाजकल्याण, पुणे
महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी), पुणे
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, साहित्यरत्न लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ मर्यादीत, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ मर्यादीत, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईकविमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ मर्यादीत, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्यादीत, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग आर्थिक विकास महामंडळ मर्यादीत, मुंबई
सर्व जिल्हाधिकारी
सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा ) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
निवासी लेखा परिक्षक, मुंबई / अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (बांधकामे)